**मार्वलला शक्ती प्रदत्त समितीच्या अधिपत्याखाली आणणे, कृत्रिम बुद्धिमत्ता वापराची कामे प्राथम्याने देणे, इत्यादी.**

# महाराष्ट्र शासन
# गृह विभाग

**शासन आदेश क्रमांक : एचडी३१०१३१३१/३/२०२५/पोल-३.**

दुसरा मजला, मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई. पिन ४०० ०३२.

दिनांक : २५ एप्रिल २०२५.

**<u>संदर्भ</u> :-** शासन निर्णय, गृह विभाग, क्र. संकीर्ण-०८२३/प्र.क्र.१३०/पोल-३, दि.१६.०३.२०२४.

**<u>प्रस्तावना.</u>**

राज्य पोलीस दलास कृत्रिम बुद्धिमत्तेचा *(Artificial Intelligence)* वापर करुन कायदा अंमलबजावणीचे कार्य अधिक प्रभावीपणे करता यावे म्हणून *"Maharashtra Research and Vigilance for Enhanced Law Enforcement Ltd. (MARVEL)"* ही शासकीय कंपनी स्थापन करण्यात आली आहे. उक्त कंपनी ही थेट राज्य शासनाच्या (गृह विभाग) अधिपत्याखाली आहे. उक्त कंपनीची दिनांक २२.०४.२०२४ रोजी कंपनी अधिनियम २०१३ याखाली नोंदणी करण्यात आली.

२. पोलीस अधीक्षक, नागपूर ग्रामीण, संचालक, भारतीय व्यवस्थापन संस्था, नागपूर, आणि मे.पिनाका टेक्नोलॉजीज खाजगी मर्या. हे मार्वलचे संचालक आहेत. तसेच, पोलीस अधीक्षक, नागपूर (ग्रामीण), हे उक्त कंपनीचे पदसिद्ध मुख्य कार्यकारी अधिकारी आहेत. मार्वलचे कार्यालय हे भारतीय व्यवस्थापन संस्था, नागपूर, यांच्या आवारात स्थित आहे.

३. मार्वलच्या स्थापनेपासून प्रथम पाच वर्षांकरिता रु.४,२०,००,०००/- *(रुपये चार कोटी वीस लक्ष फक्त)* प्रति वर्ष याप्रमाणे भागभांडवल म्हणून अनुदान देय आहे. उक्त भागभांडवलाचा पहिला हप्ता (रु.४,२०,००,०००/-) मार्वलच्या खात्यात दि.१४.११.२०२४ रोजी जमा झाला.

४. स्थापनेपासून आजपर्यंत मार्वलने गृह विभागाबरोबरच मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य, मत्स्यव्यवसाय विभाग, महसूल व वन विभाग, अशा इतर विभागांकरीताही कृत्रिम बुद्धिमत्ता सेवा पुरविण्याचे वेगवेगळे प्रस्ताव सादर केलेले आहेत. मार्वलच्या कामांची विविधता आणि तिची संभाव्य क्षमता लक्षात घेता तिला गृह विभागापुरते मर्यादित न ठेवता मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील संबद्ध प्रशासनिक विभागांच्या सचिवांच्या शक्ती प्रदत्त समितीच्या अधिपत्याखाली आणण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

५. दुसरे असे की, प्रशासकीय कामकाज सुकर व्हावे म्हणून राज्यातील शासकीय व निमशासकीय कार्यालयांमध्ये कृत्रिम बुद्धिमत्तेचा वापर सुरू झाला आहे. त्याकरिता संबंधित कार्यालये किंवा प्रशासनिक विभाग खाजगी संस्थांच्या सेवा घेतात. परंतु त्यामुळे शासकीय आधारसामग्रीच्या *(Government Data)* सुरक्षिततेस आणि गोपनीयतेस धोका असू शकतो.

म्हणून, सर्व प्रशासनिक विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांमध्ये कृत्रिम बुद्धिमत्ता वापराची कामे करुन घेण्यासाठी, ज्या प्रकरणांमध्ये शासनाने केलेल्या करारामुळे तसे करणे शक्य नाही अशी प्रकरणे खेरीज करता, मार्वलला प्राथम्य देण्याची बाबही शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय.**

मार्वल या शासकीय कंपनीच्या कामांची विविधता आणि तिची संभाव्य क्षमता लक्षात घेता तिला गृह विभागापुरते मर्यादित न ठेवता मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील पुढील शक्ती प्रदत्त समितीच्या *(Empowered Committee)* अधिपत्याखाली आणण्यात येत आहे:-

| | | |
|---|---|---|
| १) मा. मुख्य सचिव | ... | अध्यक्ष |
| २) अ.मु.स. (गृह), गृह विभाग | ... | सदस्य |
| ३) अ.मु.स./प्र.स. (महसूल), महसूल व वने विभाग | ... | सदस्य |
| ४) अ.मु.स./प्र.स., नियोजन विभाग | ... | सदस्य |
| ५) अ.मु.स./प्र.स. (वित्त), वित्त विभाग | ... | सदस्य |
| ६) अ.मु.स./प्र.स. (१), नगर विकास विभाग | ... | सदस्य |
| ७) अ.मु.स./प्र.स. (मा.तं.), सामान्य प्रशासन विभाग | ... | सदस्य सचिव. |

२. सर्व प्रशासनिक विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांमध्ये कृत्रिम बुद्धिमत्ता वापराची कामे करुन घेण्यासाठी, ज्या प्रकरणांमध्ये शासनाने केलेल्या करारामुळे तसे करणे शक्य नाही अशी प्रकरणे खेरीज करता, मार्वलला प्राथम्य देण्यात येईल. तथापि, याबाबत प्रकरणवार निर्णय उक्त शक्ती प्रदत्त समितीद्वारे घेण्यात येईल.

३. मार्वल ही उक्त शक्ती प्रदत्त समितीच्या अधिपत्याखाली आणण्यात आल्याने मुख्य कार्यकारी अधिकारी, मार्वल, यांच्या कामाचे मूल्यमापन करण्यासाठी (संचालक मंडळ हे प्रतिवेदन प्राधिकारी) मा. मुख्य सचिव हे पुनर्विलोकन प्राधिकारी राहतील.

४. उपभोक्ता विभागांना कृत्रिम बुद्धिमत्ता सेवा *(AI tools and solutions)* पुरविण्यासाठी मार्वलला आवश्यकतेनुसार कृत्रिम बुद्धिमत्ता क्षेत्रातील संस्थांचा (खाजगी कंपन्यांसहीत) सहयोग घेता यावा म्हणून तिला अशा संस्थांशी करार करण्यास, याद्वारे, प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच, कृत्रिम बुद्धिमत्ता क्षेत्रातील ज्या संस्थांशी राज्य सरकारने यापूर्वीच करार केलेले असतील त्या संस्था अशा करारांनुसार आपल्या सेवा *(AI tools and solutions)* उपभोक्ता विभागांना मार्वलच्या मार्फत पुरवतील.

५. कृत्रिम बुद्धिमत्तेच्या वापरासंबंधी शासनाने [सामान्य प्रशासन (माहिती तंत्रज्ञान) विभाग] धोरण तयार केल्यास ते अर्थातच मार्वलला देखील लागू राहील. तथापि, वरील परिच्छेद २ व ४ यांमध्ये नमूद केल्यानुसार, शासन व्यवहारात कृत्रिम बुद्धिमत्तेच्या वापराची कामे खाजगी संस्थेमार्फत करवयाची झाल्यास उक्त शक्ती प्रदत्त समितीच्या मार्फत मार्वलशी विचारविनिमय

करुन निर्णय घेण्यात येईल. अशा प्रकरणांमध्ये मार्वल स्वतंत्र व तटस्थ संस्था म्हणून समितीला सल्ला देईल.

६. मार्वलवरील अधिपत्य आणि तिच्या कामाचे स्वरूप व व्याप्ती यांमध्ये वरीलप्रमाणे बदल लक्षात घेऊन तिच्या *"Memorandum of Association"* आणि *"Articles of Association"* यांमध्ये योग्य त्या सुधारणा करण्यात येतील.

७. हा शासन निर्णय मा.मंत्रिमंडळच्या दि.०१.०४.२०२५ रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४२५१६२८२१८६२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANDEEP GORAKHNATH DHAKANE

Digitally signed by SANDEEP GORAKHNATH DHAKANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=418588839686584ca25060bf57af23a4473234ebcc421d084d8890fc37c8f673, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E7B44D71EACB46FA051532FB66A73DA715F678033161C1162FA83F6713D03552, cn=SANDEEP GORAKHNATH DHAKANE
Date: 2025.04.25 16:29:42 +05'30'

**( संदीप गोरखनाथ ढाकणे )**
**अवर सचिव, महारष्ट्र शासन.**

**प्रति,**

मा. राज्यपाल यांचे सचिव, राज भवन, मुंबई.
मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
मा. उप मुख्यमंत्री, नगरविकास, यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. उप मुख्यमंत्री, वित्त व नियोजन, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, विधान भवन, मुंबई.
मा. मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
मुख्य कार्यकारी अधिकारी, मार्वल, नागपूर.

**प्रत-**

सर्व संचालक, मार्वल, नागपूर
सहसचिव/उपसचिव,गृह विभाग
निवड नस्ती, पोल-३.